# अनुक्रमणिका

# संपादकीय

नमस्कार मंडळी,

आज "बहर - सप्टेंबर २०१४" आपणास सुपूर्त करताना मला विशेष आनंद होत आहे. यास कारण असे, की नुकताच पार पडलेल्या गणेशोत्सवाच्या दिमाखदार सोहळ्याच्या आठवणी मनामध्ये अजूनही ताज्या आहेत. दरवर्षीप्रमाणे यंदाही आपल्या मंडळातर्फे गणेशोत्सव मोठ्या दिमाखात साजरा करण्यात आला. झांज, लेझीम, विविध भजने आणि अलोट जनसागर यांच्या सानिध्यात पार पडलेल्या या सोहळ्याचे वर्णन गणरायालाही "माझ्या आठवणीतील गणेशोत्सव" असेच करावेसे वाटले असावे.

गणेशोत्सव हा आपल्या मंडळाचा वर्षातील तसा सर्वात मोठा कार्यक्रम असतो. या कार्यक्रमाच्या व्यवस्थापनेसाठी भरपूर मनुष्यबळाची आवश्यकता नेहेमीच असते, आणि यंदाही आपल्या मंडळाच्या सर्व सभासद सदस्यांनी उस्फुर्तेने मदतीचा हात पुढे करून कार्यक्रम यशस्वी करण्यात समिती सदस्यांना मोलाची साथ दिली. त्याबद्दल मंडळाच्या समितीच्या वतीने मी सर्व सभासदांचे आभार व्यक्त करू इच्छितो.

आता बहर बद्दल, २०१४ - २०१५ समितीने कार्यभार स्वीकारल्यापासूनचा हा चौथा बहर. श्री गणरायाच्या आशीर्वादाने आम्ही "बहर" ला बहर आणण्याचा प्रामाणिक प्रयत्न करीत आहोत. काही चुकाही झाल्यात, परंतू सर्व गोष्टींचा बारकाईने विचार करून यावेळी मात्र आमच्यामधील त्रुटी जाणकारांकडून तपासून घेऊन आम्ही एका नव्या उमेदीने बहरची बांधणी आणि मांडणी केली आहे. तरी आशा करतो की " बहर - सप्टेंबर २०१४" हा अंक तुमच्या पसंदीस उतरेल.

या अंकाबद्दल विशेष म्हणजे, या अंकाचे मुखपृष्ठ आपल्याच मंडळाचे सदस्य श्री. अनिल महाजन यांनी रेखाटले आहे तर छायाचित्र श्री. विकास यादव यांचे आहे. 'गणपती बाप्पा मोरया' या लेखामध्ये सौ. विद्या भट यांनी आपल्या गणेशोत्सवातील आठवणींना उजाळा दिलेला आहे तर, सौ. योगिनी गजरे यांनी गणेशोत्सवाची माहिती आणि महती 'आपला आवडता गणेशोत्सव' या त्यांच्या लेखाद्वारे आपल्यापर्यंत पोहोचवली आहे. श्री. मंदार आपटे यांनी 'पुस्तक परिचय' या सदरात यावेळी 'द्रौपदी इन् हाय हील्स' या अदिती कोतवाल लिखित पुस्तकाची आपणास ओळख करून दिलेली आहे तसेच अजय पडवळ यांच्या छायाचित्रण विशेष सदरामध्ये 'कॅमेराची काळजी' या लेखाचा दुसरा भाग समाविष्ट केला आहे. याशिवाय डॉ. सारिका जायखेडकर यांचा 'लागली कुणाची उचकी' हा वैद्यकीय माहितीपूर्ण लेख 'उचकी' मागच्या अनेक शंका - कुशंकांचे निरसन करतो. श्री बाळ तावडे यांची 'घराची ओढ' हि कविता वाचल्यावर अनेक आठवणी ताज्या होऊन घराची ओढच लागते. यावेळीपासून आम्ही “ताज्या घडामोडी” नावाचे एक सदर सुरु केले आहे, 'बहर सप्टेंबर' च्या अंकात 'एएलएस आईस बकेट चॅलेंज', 'पहिला स्मार्टफोन', 'ड्रोन डिलिव्हरी' याविषयीची माहिती समाविष्ट केली असून इथून पुढच्या प्रत्येक बहरमध्ये नवनवीन विषयांची माहिती 'ताज्या घडामोडी' या सदरामार्फत आपणासमोर आणण्याचा आमचा मानस आहे.

मंडळी पुढल्या महिन्यात दिवाळी, प्रतिवर्षीप्रमाणे यंदाही महाराष्ट्र मंडळ अबूधाबी बहर दिवाळी विशेषांक प्रकाशित करणार आहे. याबद्दलची अधिक माहिती लवकरच आपल्यापर्यंत ई-मेलद्वारे आम्ही पोचवू तेव्हा आपल्या विचारांना कागदावर वाट करून द्या आणि आपले लेख, कविता, शब्दकोडी, अविस्मरणीय अनुभव, आमच्यापर्यंत पोहोचावा. आशा करतो की हा बहर वाचकांच्या पसंदीस उतरेल आणि इच्छितो की दिवाळी बहरसाठी आपला भरघोस प्रतिसाद मिळेल. आपले निःसंकोचपणे आम्हाला जरूर कळवा (ई. पत्र - maharashtramandalad@gmail.com).

निहाल मांडके, कोमल तावडे, राधिका लपालीकार
बहर टीम :- २०१४ - १५

# "गणपती बाप्पा मोरया........"

'गोविंदा आला रे आला, जरा मटकी संभाल ब्रीजबाला' म्हणत दहिहंडीच्या प्रचंड जल्लोषानंतर प्रत्येकाला वेध लागतात ते आपल्या लाडक्या बाप्पांचे, बाप्पांच्या मुर्तीवर मुर्तीकारांचे हात शेवटचे फिरायला लागून त्यांना पूर्णत्वाकडे नेण्याच्या कामाला भलताच वेग चढतो. छोट्या मोठ्या गणेशोत्सव मंडळाच्या कार्यकर्त्यांच्या रात्रीच्या बैठकांना चांगलाच जोर चढतो. घराघरात रंगरंगोटी, माळा, बाप्पांच्या सजावटीसाठी मखर व सजावटीचे साहित्य, प्रसादासाठी पंचखाद्द्याचे लाडू, साखर खोबरे बनवणे यासारख्या कामांना वेग चढायला लागतो.

माझे वडील कॉलेजला असल्यापासून स्वतः हाताने शाडूचा गणपती बनवत (अलीकडे दोन वर्षात मात्र त्यांचा हात थरथरायला लागल्यामुळे त्यांनी मूर्ती बनवणे बंद केलं आहे). त्यामुळे नागचवथीला (नागपंचमीच्या आदल्या दिवशी) ते मूर्ती बनवण्याचा मुहूर्त करीत. शाडूमध्ये कापूस मिक्स करून ते मूर्तीसाठी शाडू भिजवत असत. ओल्या कापडात ही शाडू ते गुंडाळून ठेवत. त्यांची मूर्ती बनवून शिल्लक राहणाऱ्या शाडूवर आम्हा मुलांचा डोळा असायचा. त्यातून आम्ही भातुकलीची भांडी, फळे इ. गोष्टी बनवत असू. कोण जास्त छान बनवत असेल त्याला दादा त्यांच्यातला रंग वापरायला देत असत. त्यामुळे आम्हा बहिणींच्यात चढाओढ लागत असे. दादांचे बघून पुढे माझी मोठी बहीणही गणपती बनवायला लागली. तिने तर एकदा सोसायटीसाठी मोठा गणपतीही हाताने बनवून दिला.

एक वर्ष माझा मोठा मुलगा श्रेयस यानेही आबांचे बघून गणपती बनवला होता. दादा रंगांना शायनिंग यावे म्हणून पहिल्यांदा अभ्रकाच्या पट्ट्या वापरात असत नंतर ते वॉर्निश वापरायला लागले. आम्हाला त्या अभ्रकाच्या पट्ट्यांचेही खूप आकर्षण होते. दादांचा डोळा चुकवून आम्ही त्यातली एक तरी पट्टी पळवायचो. ती अंगाला चुरा करून लावल्यावर अंग चमकायचे, तसेच गणपतीच्या आभुषणांसाठी दादा एक सोनेरी पावडर वापरायचे, त्यानेही अंग तसेच चमकायचे. खरंच लहानपणी किती छोट्या छोट्या गोष्टीत आनंद असतो ना...?

माझ्या माहेरी सात दिवसाचा गणपती असतो. त्या सात दिवसांत सकाळ संध्याकाळ आरतीच्या वेळी झांजाच्या आवाजाने साऱ्या आसमंतात एक वेगळाच जल्लोष भरला जायचा. आरती झाल्यावर दादा शंखनाद करत. हा शंख वाजवायची एक 'Particular Trick' आहे. ती ट्रीक मला जमायची त्यामुळे मलाही त्यावेळी खूप ग्रेट वाटायचं. मागच्या वर्षी सहज परत एकदा ट्राय केला तर फार काळ दम टिकला नाही. आमच्या घराच्या आवारात खूप दुर्वा यायच्या त्यामुळे पहिल्या दिवशी २१ जुड्यांचा हार मी गणपतीला वाहायची. त्यात माझे दोन हेतू साध्य व्हायचे, एक म्हणजे मला दुर्वा काढायला खूप आवडायच्या आणि दुसरा म्हणजे त्याच्या नावाखाली अभ्यासाला दांडी मारता यायची... आमच्या शाळेतही गणपती असायचा. त्याच्यासमोर श्रीखंडे सर म्हणून ड्रॉईंग टीचर होते, ते खूप छान रांगोळी काढायचे. त्यांनी एक वर्ष चोरून लोणी खाणाऱ्या कृष्णाची रांगोळी काढली होती. त्या कृष्णाच्या चेहऱ्यावरचे खट्याळ आणि तितकेच निरागस भाव, आणि यशोदेच्या चेहऱ्यावरील लटक्या रागाचे भाव आजही माझ्या डोळ्यासमोर येतात.

गणपतीच्या दिवसातला अजून एक आवडता प्रोग्राम म्हणजे संध्याकाळी गणपती समोरचे देखावे बघायला बाहेर पडणे. लहानपणी माझे आजोबा आम्हाला बोटाला पकडून गणपतीचे देखावे बघायला न्यायचे. त्याकाळी बहुतेक देखावे हे पौराणिक कथांवर आधारित असायचे. आजोबा मग त्या त्या देखाव्याची गोष्ट सांगायचे. नकळतपणे त्या साऱ्या गोष्टींचे संस्कार

मनावर होत गेले आणि त्यामुळेच आजही त्या संस्कारांची मुळे घट्ट रोवली गेलेली आहेत. नकळतच वाचनाची आवड निर्माण होत गेली, विचारांना एक बेस मिळत गेला. आजच्या पिढीला टीव्ही, लॅपटॉप, इंटरनेट यासारखी दृकश्राव्य माध्यमे माहितीसाठी उपलब्ध आहेत हे जरी खरे असले तरी या सगळ्या गोष्टींना आजीआजोबांनी स्वतः सांगितलेल्या गोष्टींची सर नाही हेही तितकेच खरे. मग भले त्यात रंजकता आणण्यासाठी काही गोष्टी ॲड केल्या केलेल्या असतील त्यामुळे त्या गोष्टी अप टू मार्क नसतीलही कदाचित पण ती गोडी माठातल्या पाण्याइतकीच तृप्ती देणारी होती हे नक्की...

नंतर थोडा मोठा झाल्यावर आम्ही मैत्रिणी आपापल्या तायांबरोबर गणपती बघायला जायचो. त्यावेळी आजच्यासारखी मुलींना एकटं दुकटं फिरताना भीती वाटायची नाही. त्यावेळची अजून एक गमतीदार गोष्ट आठवते. देखावे लोकांना पाहण्यासाठी खुले व्हायच्या आधीपासून तयारीच्या काळात हे देखावे पडद्याच्या आड बंद असायचे यावेळी हे देखावे पडद्याच्या फटीमधून पडदा बाजूला करून गेस करायला खूप मजा यायची. यामध्ये बऱ्याच वेळा मंडळातील मोठ्या कार्यकर्त्यांकडून ओरडणी खायला लागायची. पण वयाच्या निरागसतेमुळे परत दुसऱ्या दिवशी नव्या जोमाने गाडी दुसऱ्या देखाव्यांकडे वळायची. लग्नानंतरही आमचा मित्रमैत्रिणींचा ग्रुप नाशिकमध्ये गणपती बघायला बाहेर पडायचा. मध्येच पाऊसही यायचा, पण ती मजा देखील खूप वेगळी होती.

पावसात भिजत बाईकवर बसून तिखट मीठ लावून खाल्लेल्या भुट्ट्याची नाश काही अनोखीच असायची. श्रेयसला आता भले हि मजा आठवत नसेल पण त्याच्या ४ ते ५ वर्षांपर्यंत आम्ही इंडियात होतो त्यामुळे थोड्याफार प्रमाणात का होईना ही मजा त्याने अनुभवली.. बाईच्या टाकीवर पिसाची टोपी घालून तोही पिपाणी वाजवत आमच्यासोबत मोठ्या उत्साहाने हिंडायचा.. एक वर्ष आम्ही पुण्याचे गणपती बघायला गेलो होतो... त्याचीही मजा निराळीच होती.

पुढे २००२ साली आम्ही नवनिर्माण सोसायटीमध्ये राहायला आलो. आमच्या सोसायटीत ५ दिवसांचा गणपती असतो. सोसायटीत श्रीकांत जोशी, सौ. रिमा जोशी, किरण जोहरापुरकर, सौ. स्वाती जोहरापुरकर, पराग डबीर इ. प्रचंड उत्साही मंडळी होती. त्यांच्यासोबत गणपती उत्सवात सहभागी होताना खूप मजा यायची. गणपतीसाठी प्रोग्राम बसवायला महिनाभर आधीपासून सुरुवात व्हायची. नाटकासाठी संहिता शोधणे, मुलांची निवड करणं, सगळ्या पोरांना त्यांचे शिकवण्यांचे, शाळांचे रुटीन सांभाळून एकत्र करणं हे खूप मोठं काम असायचं. पण हे सगळं करताना खूप मजा यायची. रिमा जोशी शाळेत शिक्षिका असल्यामुळं आम्हाला नाटकाची पुस्तके सहजपणे उपलब्ध व्हायची. एक दोघे सोडले तर बाकीची सगळीच मुले इंग्रजी माध्यमाची असल्यामुळे व काहीतर अमराठी असल्यामुळे त्यांच्याकडून संवाद पाठ करून घेणे महाकठीण काम असायचे. पण तरीदेखील मुलांबरोबर काम करताना एक वेगळाच आनंद मिळतो. कारण त्यांची कुठलीही गोष्ट आरश्याइतकी स्वच्छ असते, त्यात एवढासा देखील दिखाऊपणा नसतो. त्यांचा आनंद, त्यांचे प्रेम त्यांच्या रुसव्या फुगव्या इतकेच सच्चं असतं. त्यामुळे त्यांच्याबरोबर काम करताना मिळणारा आनंद हा त्यांच्याइतकाच निरागस आणि खरा असतो. मागच्या वर्षी इथल्या बच्चेकंपनीचे बालनाट्य बसवताना मला हाच आनंद पुन्हा एकदा नव्याने अनुभवायला मिळाला. गणपतीच्या आदल्या दिवशी आख्खी सोसायटी डेकोरेशनसाठी पार्किंग स्लॉट मध्ये जमायची आणि मग रात्री दोन-तीन वाजेपर्यंत गप्पा गोष्टी करत सजावट पूर्ण केली जायची. सकाळच्या आरतीची जबाबदारी प्रामुख्याने गृहिणींवर यायची.

हे सगळं करत असताना विसर्जनाचा दिवस कधी उगवायचा कळायचाच नाही. मग मात्र मनाला एक अनोखी हुरहुर लागायची. ५, ७, १० दिवस जे बाप्पा आपल्या घरी आले, ज्यांच्या आगमनाने सगळा आसमंत एका नव्या उत्साहाने, जल्लोषाने, आनंदाने भारला गेला त्या बाप्पांना निरोप द्यायचा क्षण मात्र नकोस वाटतो. नकळत डोळ्यांच्या कडा

पाणावतात. दादांकडे मंत्री तलाव म्हणून होता तिथे गणपती विसर्जन व्हायचे. दादांबरोबर मीही विसर्जनाला जायचे. गम्मत म्हणजे याच मंत्री तलावाच्या काठावर एक मशीद होती तरी देखील गणपती विसर्जनाच्या दिवशी जातीय दंगे झालाचे माझ्या ऐकिवात नाही. बाप्पाला निरोप देताना 'गणपती बाप्पा मोरया, पुढच्या वर्षी लवकर या' म्हणत ज्यावेळी आम्ही रस्त्याने जायचो त्यावेळी येणारा जाणारा प्रत्येकजण देखील त्याला प्रतिसाद द्यायचा. परत येताना तिथली वाळू आणून घरात सगळीकडे टाकायची म्हणजे घरात सगळीकडे सुख समृद्धी आणि शांती नांदते अशी समजूत होती. पुढे या तलावात नगरपालिकेच्या दुर्लक्षामुळे कैंदाळ साठले त्यामुळे माझ्या वडिलांनी घरातच मोठ्या बादलीत गणपती विसर्जन करून ते पाणी झाडांना घालायला सुरुवात केली कारण केवळ पाण्याच्याच ठिकाणी विसर्जन करायचं या अट्टहसापायी घाणेरड्या अस्वच्छ जागी विसर्जन करणं त्यांना मान्य नव्हतं.

नाशिकला सोसायटीच्या गणपतीचा विसर्जन गोदावरीत व्हायचं. विसर्जनासाठी सोसायटीतले लहान-थोर बायका-पोरं सर्वजण जायचो. मला आठवते एक वर्षी श्रेयसने बाप्पाला पाण्यात का टाकायचे, मग तो बुडेल, त्याला बाऊ होईल म्हणून रडून गोंधळ घातला होता. शेवटी तो इतके दिवस आपल्याकडे आला होता की नाही मग आता त्याच्या आईला त्याची आठवण यायला लागली आहे, तिचा काल त्याला बोलवायला फोन आला होता म्हणून तो त्याच्या आईकडे चालला आहे. त्याच्या आईचे घर पाण्यात असते आणि बाप्पाला पोहायला येते .... म्हणून त्याची समजूत काढता काढता सगळ्यांच्याच नाकी नऊ आले. पुढच्या वर्षी परत बाप्पा आपल्याकडे येणार आहे या आशेवर आणि विश्वासावर साहेबांची स्वारी शेवटी शांत झाली....

खरंच बाप्पांना निरोप देताना छोट्यांचेच काय पण मोठ्यांचेही डोळे नकळत पाणावतात. दहा दिवसात हा बाप्पा आपल्या घरातल्या एखाद्या माणसासारखा झालेला असतो. घरातला आणि मनातला देखील एक कोपरा त्याने व्यापलेला असतो. त्यामुळेच त्याला निरोप देऊन आल्यानंतर सगळं घर मोकळं वाटतं पण मुलांसारखाच तो पुढच्या वर्षी लवकर येणार आहे या आशेवर आणि विश्वासावर आपण नवा दिवस सुरु करतो.

**"गणपती बाप्पा मोरया"**

सौ. विद्या श्रीकांत भट

# आपला आवडता गणेशोत्सव

हिंदू धर्मात बरेच सण एकत्र येउन साजरे केले जातात. पण मुख्यतः महाराष्ट्रात साजरा होणारा गणेशोत्सव खऱ्या अर्थाने सार्वजनिक म्हणता येईल. कारण सर्व भाषिक एकत्र येउन हा सण मोठ्या उत्साहाने साजरा करतात. "गणपती जवळ आले ही जाणीवच जणू सगळ्यांसाठी उत्साहाची असते. गणेशोत्सवाच्या निमित्ताने लोकांमध्ये एकजूट निर्माण व्हावी आणि समाजात स्वातंत्र्याबद्दल जनजागृती व्हावी अशा दुहेरी हेतूने लोकमान्य टिळकांनी हा गणेशोत्सव सुरु केला होता.

गणेशोत्सव म्हणजे विद्येचे आराध्य दैवत असणाऱ्या विघ्ननाशक गणपतीचा उत्सव. शब्दभाषा समजणाऱ्या गणेशाला आपली दुखः समस्या सांगण्याचा काल म्हणजे गणेशोत्सव. म्हणूनच भारतीय संस्कृतीशी आणि परंपरेशी परिचय असणाऱ्या कोणालाही श्री गणेशाबद्दल विशेष प्रेम आणि अपार आकर्षण वाटते. आपली अशी श्रद्धा आहे की आपले कोणतेही कार्य निर्विघ्नपणे पार पडण्याचे सामर्थ्य या दैवतेच्या कृपेमध्ये आहे. म्हणूनच कोणत्याही कामाचा आरंभ करताना आपण न विसरता 'श्री गणेशाचे' पूजन करतो. आपणास हि रूढी आपल्या नित्याच्या बोलीत एक वाक्यप्रयोगाची नेहमी आठवण करून देते. ती म्हणजे, एखाद्या कार्याचा श्रीगणेशा झाला म्हणजे त्या कार्याचा आरंभ झाला.

खरे तर हिंदू धर्मानुसार गणेश चतुर्थी हा दिवस भाद्रपद शुद्ध चतुर्थी या तिथीला साजरा करतात. या दिवशी श्रीगणेश पृथ्वीवर येतात आणि दीड दिवस पृथ्वीतलावर मनुष्य आणि प्राणिमात्रांच्या समस्या जाणून घेतात. जरी गणेश मूर्तीत दैवत्व दीडच दिवस असले तरी आपण मात्र अकरा दिवस हा सण मोठ्या उत्साहात साजरा करतो.

जाणून घेऊ श्रीगणेशाबद्दल :-

**महत्व**

अध्यात्मशास्त्रदृष्ट्या प्रत्येक देवता म्हणजे विशिष्ट तत्त्व आहे. दर महिन्याच्या चतुर्थीला गणेशतत्त्व नेहमीच्या तुलनेत पृथ्वीवर १०० पटीने कार्यरत असते, तर गणेशोत्सवामधील दीड दिवसांत ते १००० पटीहून अधिक कार्यरत असते.

**गणेश मूर्तीची उंची किती असावी ?**

शास्त्रानुसार गणेश मूर्तीची उंची मर्यादित, जास्तीत जास्त दीड मीटर उंचीची असावी. मोठ्या मूर्तींची उंची जास्त असल्याने आणि त्यासाठी आवश्यक असणारी माती उपलब्ध न झाल्याने कित्येकदा त्यात पाला पाचोळ्याचा वापर केला जातो. अशा मूर्तीत किती दैवत्व असणार? तसेच मोठ्या मूर्ती बनविताना मूर्तीला आधार देण्यासाठी लोखंडी सळ्यांचा आधार घ्यावा लागतो. मूर्तीसाठी अशा वस्तूंचा वापर करणे अयोग्य आहे म्हणून शक्यतो मूर्ती हि चिकणमातीपासून बनलेली असावी.

**पाटावर बसलेली मूर्ती का असावी ?**

जसे आपल्याकडे कोणताही पाहुणा आल्यास आपण त्यास बसावयास आसन देतो, त्यात ताटकळत उभे ठेवत नाही त्याचप्रमाणे मूर्ती १० दिवस उभी राहिल्यामुळे तिच्या पायांवर भार येउन ती तुटण्याची शक्यता असते, म्हणूनच पाटावर बसलेली मूर्तीच असावी.

**प्रथम गणेशपूजन का करतात ?**

गणपति दशदिशांचा स्वामी आहे. दशदिशा म्हणजे अष्टदिशा अधिक ऊध्र्व (वरची) आणि धर (खालची) अशा दोन दिशा. इतर देवता त्याच्या परवानगीशिवाय कोणत्याही दिशेने येऊ शकत नाहीत; म्हणून कोणतेही मंगलकार्य किंवा इतर कोणत्याही देवतेची पूजा करतांना प्रथम गणेशपूजन करतात.

**पूजेत डाव्या सोंडेचा गणपति का ठेवावा ?**

पूजेत शक्यतो डाव्या सोंडेचा गणपति ठेवावा. उजव्या सोंडेचा गणपति हा अतिशय शक्तीशाली व जागृत आहे, असे म्हटले जाते. याउलट डाव्या सोंडेचा गणपति शीतल व अध्यात्माला पूरक असतो, याची पूजा नेहमीच्या पद्धतीने केली जाते.

**श्री गणपतीला दुर्वा व लाल फुले का वहावित ?**

दुर्वांमध्ये श्रीगणेशाचे तत्त्व जास्तीतजास्त प्रमाणात आकृष्ट करून घेण्याची क्षमता असते. त्यामुळे गणपतीला दूर्वा वाहिल्याने मूर्तीत मोठ्या प्रमाणावर गणेशाची शक्ती जास्त प्रमाणात आकृष्ट होऊ मूर्ती जागृत होते. या दूर्वा नेहमी कोवळ्या अन् लहान आकाराच्या एकत्र जुडी करून वाहव्यात. दूर्वांना ३, ५, ७ अशा विषम संख्येच्या पात्या असाव्या. गणपतीच्या पूजेत लाल वस्त्र, जास्वंदीसारखे लाल फूल, रक्तचंदन यांसारख्या लाल वस्तू वापरणे फार महत्त्वाचे असते. याचे कारण म्हणजे; गणपतीचा वर्ण लाल आहे. पूजेत वापरलेल्या वस्तूंच्या लाल रंगामुळे गणेशाचे तत्त्व मूर्तीकडे जास्त प्रमाणात आकृष्ट होते व त्यामुळे मूर्ती जागृत व्हायला मदत होते.

**मोदक**

'मोद' म्हणजे आनंद व 'क' म्हणजे भाग. मोदक म्हणजे आनंदाचा लहानसा भाग. म्हणूनच मोदक हे आनंद प्रदान करणारी शक्ती मानली जाते. 'मोदक' हे ज्ञानाचे प्रतिक आहे; म्हणून त्याला 'ज्ञानमोदक' असेही म्हणतात. ज्ञान प्रथम थोडे आहे असे वाटते (मोदकाचे टोक हे याचे प्रतीक आहे); पण अभ्यास करू लागल्यावर समजते की, ज्ञान हे फारच मोठे आहे. (मोदकाचा खालचा भाग हे त्याचे प्रतीक आहे.) मोदक गोड असतो, ज्ञानाचा आनंदही तसाच असतो.

**गणपतीच्या विविध अवयवांची माहिती आणि महत्व:-**

**मुकुट -** आपणास उच्च विचारांचे संकेत देते.

**हत्तीसारखे मस्तक -** हत्तीसारखे असलेले मस्तक हे मांगल्य सामर्थ्य आणि चाणाक्ष बुद्धीचे प्रतिक दर्शविते. गजराज हा शक्तिशाली आणि अवाढव्य प्राणी असला तरी निरागस आणि मायाळू आहे.

**तोंड -** श्री गणेशाचे छोटे मुख असे दर्शविते की मनुष्याने वायफळ बोलण्यात कमी वेळ घालवून तीच ऊर्जाशक्ती विचार आणि कृती करण्यासाठी उपयोगी आणावी.

**मोठे कान -** गणपती बाप्पा सदैव आपल्या भक्तांनी केलेल्या विनंती, याचानेबद्दल दक्ष असतात. तसेच मनुष्याजवळ दुसर्याचे ऐकण्याची क्षमता असावी. त्यांनी जास्तीत जास्त श्रवण करून चांगल्या कल्पना आत्मसात केल्या पाहिजे.

**सोंड -** श्री गणेशाची वक्र सोंड हि फार लवचिक आहे. तसेच मनुष्याचे मन सुद्धा कुठल्याही परिस्थितीशी जुळवून घेण्यास समर्थ असावे. ते नेहमी आयुष्यात येणाऱ्या चढ उतारांना सामोरे जाण्यास तयार असावे.

**दात -** गणपती बाप्पाला फक्त एकाच सुळा दात आहे आणि दुसरा सुळा तुटलेला आहे. यावरून आपणास संकेत मिळतो की मनुष्याने नेहमी चांगल्या कल्पना जोपासून वाईट विचार टाकून दिले पाहिजेत.

**पोट -** गणपती बाप्पाचे विशाल पोट हे संकेत देते की मनुष्याजवळ जगातील चांगल्या आणि वाईट गोष्टी पचवून घ्यायची क्षमता हवी.

**मूषक -** मुषकराज हे श्री गणेशाचे वाहन आहे. ते इच्छा आणि आकांक्षेशी निगडीत आहे. मूषक राजाची ख्याती हि अति लोभी आणि चापाल्तेशी निगडीत आहे. ते नेहमी इकडून तिकडे अन्नासाठी पलायन करीत असतात आणि गरजेपेक्षा जास्त अन्नाची नासाडी करतात. त्याचप्रमाणे जर आपणसुद्धा लोभीपणा केला तर आपण आपले पूर्ण आयुष्य एकामागून एक येणाऱ्या इच्छा पूर्ण करण्यासाठी व्यर्थ घालवू. म्हणूनच गणपती बाप्पांसारखे आपण आपल्या इच्छांना नियंत्रणात ठेवले पाहिजे.

सर्वांच्या आयुष्यातला आनंद हा गणरायाच्या कानासारखा विशाल असावा.
अडचणी उंदराइतक्या लहान असाव्या
आयुष्य हे गणपती बाप्पांच्या सोंडेइतके मोठे असावे आणि
आयुष्यातील क्षण हे मोदकासारखे गोड असावेत.

**गणपती बापा मोरया !!**

सौ योगिनी गजरे

# घराची ओढ

सभोवती हिरवी झाडी
पलीकडे शेतवाडी
खळाळत हा ओहळ
काय पाणाल्याही गोडी
माझ्या घराचीही ओढ मला लावी माया वेडी ॥

कधी गावा वळसा घेई
कधी झाडामाडातून जाई
उंचावरून झेपावत कधी
खोल खोल घेई उडी
माझ्या घराचीही ओढ
मला लावी माया वेडी ॥

झुळू झुळू वाहे वारा
करी कर्दळीशी खोडी
जाईजुईच्या या वेली
जांभळीशी नाते जोडी
माझ्या घराचीही ओढ
मला लावी माया वेडी ॥

पुढे प्रशस्त अंगण

दारी तुलसी वृंदावन

घराघरा क्षेम धाडी

पायवाट नागमोडी

माझ्या घराचीही ओढ

मला लावी माया वेडी ॥

श्री. बाळ तावडे



छाया :- निहाल मांडके

## द्रौपदी इन् हाय हील्स

**लेखक :** अदिती कोतवाल

**प्रकाशक :** पेंग्विन मेट्रो रीड्स

**पाने :** 224

**प्रकाशन :** 2013

**भाषा :** इंग्रजी

दिया पांचाळ ही एक गर्भ श्रीमंत उद्योजक आणि मोठ्या संपत्तीची वारसदार आहे. ती करण रवी या देखण्या तरूणाकडे आकर्षित झाली आहे आणि तिला अर्जुन कपूर हा तरूण पण आवडतो. तिचा सर्वात जवळचा मित्र आणि मार्गदर्शक आहे कृष्ण गोपालकृष्णन्. दिया कोणाची निवड करेल? काय ही कथा ओळखीची वाटते आहे का?

सूज्ञ वाचकांच्या लक्षात आले असेलच. हे आधुनिक काळातले महाभारत आहे. जशी कथा पुढे सरकते तशी दियाला तिच्या आणि द्रौपदीतील साम्याची जाणिव होते. द्रौपदीने तिच्या आयुष्यात जे काही निर्णय घेतले आणि पर्याय निवडले त्यातून नियतीने तिचे प्रारब्ध ठरवले आणि त्यातून इतिहास घडला.

दिया पुढे कुठले पर्याय उपलब्ध आहेत? ती अर्जुन कपूर आणि त्याच्या भावांबरोबर लग्न करेल का करणची निवड करेल? का तिला आणखी कोणी पसंत पडेल? दिया आणि द्रौपदी या कार्माने बांधल्या गेल्या आहेत का? आधुनिक काळात भीष्म, कुंती, दृष्टद्युम्न, दु:शला, दुर्योधन, द्रुपद आहेत का? या लोकांचा दियाच्या निर्णयांवर आणि भविष्यावर किती प्रभाव पडेल? या सगळ्यात कृष्णाची काय भूमिका असेल?

अदितीची लेखनशैली ओघवती आहे. ही कथा महाभारताला समांतर असल्यामुळे लेखिकेला संपूर्ण नवनिर्मिती करावी लागलेली नाही. तिने दियाचे पात्र जोमाने उभे केले आहे. दिया ही आजची तरूण उद्योजक आहे पण तिची पाळेमुळे भारतीयत्वात खोल रूजलेली आहेत. ती आजची मनमोकळी  व स्वतंत्र तरूणी आहे पण थिल्लरपणा न करता तिला प्रेमाच्या सुंदर बंधात गुंतायचे आहे. लग्न करायचे आहे. लेखिकेने दिया सुंदर चितारली आहे.

पुस्तक जेव्हां कथेला कमी पडते तेंव्हा अदितने ती कमतरता आपल्या लिखाणाने भरून काढली आहे. या पुस्तकाचा शेवट कसा होणार हे अनुभवी वाचक निम्म्या वाटेत ओळखतात. महाभारताचा कथाविस्तार पहाता अदिती या पुस्तकात खूप

चकवे व अनपेक्षित वळणे आणू शकली असती. कथा आणखी बिकट आणि उत्कंठावर्धक करू शकली असती. पण त्या मायाजालात न अडकता लेखिकेने कथा साधी व सोपी ठेवणं पसंत केले आहे हिच एक रूखरूख.

मी हे पुस्तक एका बैठकीत संपवलं. वेगळेपणासाठी जरूर वाचा.



# लागली कुणाची उचकी

आयुष्यभर उचकी लागू शकते. सहसा उचकी आपोआपच थांबते. "थोड्या वेळेपुरता त्रास‘ अशा दृष्टीने उचकीकडे पाहिले जाते. छातीच्या पिंजऱ्यात विभाजक पडदा (डायफ्रॅम) असतो. हा स्नायूंचा बनलेला असतो. कधी कधी अकस्मात या स्नायूंचे आकुंचन होते. हे आकुंचन सर्वस्वी अनैच्छिक असते. बऱ्याच वेळा ते पाठोपाठ काही वेळा होत राहते. अशा आकुंचनानंतर स्वरयंत्रणेतील पट्ट्या एकमेकाजवळ येतात. या घटनेला "उचकी लागली‘ असे म्हटले जाते. विभाजक पडद्याची एक बाजू (उजवी अथवा डावी) अशी आकुंचन पावते. डावी बाजू अधिक वेळा आकुंचित पावते. उचकीचा त्रास स्त्रियांपेक्षा पुरुषांना अधिक वेळा होतो. गर्भाच्या चौथ्या महिन्यापासून उचकी लागताना आढळते. जशी गर्भाची वाढ होते तशी अधिकाधिक जास्त वेळा उचकी लागते. उचकी लागण्याचे प्रमाण जन्मानंतर अर्भकावस्थेत चालू राहते. असे का होत असेल हे अद्याप समजलेले नाहीये. आयुष्यभर उचकी लागू शकते. सहसा उचकी आपोआपच थांबते. "थोड्या वेळेपुरता त्रास‘ अशा दृष्टीने उचकीकडे पाहिले जाते.

कधी कधी मात्र उचकी दीर्घ काळ लागत राहते आणि सामान्यपणे केलेल्या घरगुती किंवा औषधी उपचारांना दाद देत नाही. अशा वेळेला रुग्ण, नातेवाईक आणि उपचार करणाऱ्या वैद्यकीय व्यावसायिकाच्या सहनशक्तीचा अंत होतो. थोडा वेळ लागणाऱ्या उचकीचे दखलपात्र अपाय नसतात. उचकी लागताना विभाजक पडद्याच्या आकुंचनामुळे छातीच्या पिंजऱ्यातील दाब कमी होतो. परिणामी, रक्तदाब कमी होतो. त्याचबरोबर गिळलेले अन्न जठरात उतरत नाही. अर्थात हे परिणाम नेहमी लागणाऱ्या अल्पकाळ टिकणाऱ्या उचकीच्या बाबतीत फारसे गंभीर नसतात.

उचकी का लागते, याचे एक निश्‍चित कारण नसते. उचकी ही एक प्रतिक्षिप्त क्रिया (रिफ्लेक्स ऍक्शन) आहे. या प्रतिक्षिप्त क्रियेचे केंद्र मेंदूतील ब्रेनस्टेम या भागातील खालच्या भागात असते. फ्रेनिक आणि व्हेगस या शिरांतून या केंद्राकडे जाणाऱ्या उद्दीपनात्मक लाटांमुळे हे केंद्र उद्दीपित होते. फ्रेनिक शिरेतून विभाजक पडद्याला उत्तेजन मिळते व ते स्नायू आकुंचित पावतात. उचकी या प्रकारात स्नायूंचे काही तंतू आकुंचन पावतात व पुन्हा पुन्हा तसेच होत राहते. उचकी लागण्याची अनेक कारणे असू शकतात. एखाद्या व्यक्तीला अकस्मात उत्तेजन झाले अथवा अकस्मात तणावाला तोंड द्यावे लागले तरी उचकी लागू शकते. मेंदूला जाणाऱ्या रक्तपुरवठ्यात काही अडथळा आला, मेंदूत गाठ झालेली असली, नुकतीच पोटावर शस्त्रक्रिया झाली असली किंवा नुकतीच हृदयावर शस्त्रक्रिया झालेली असली तरी उचकी लागते. विभाजक पडद्याच्या खालून कशाचाही दाह झाला तरी उचकी लागते. असा प्रकार जठर किंवा यकृताच्या आजारात होतो. अन्ननलिकेच्या अस्तराच्या दाहामुळे उचकी लागते. असा प्रकार जठरातून अन्ननलिकेत जाणाऱ्या ऍसिडयुक्त रसांमुळे होतो. मूत्रपिंडाचे कार्य न झाल्याने रक्तात युरिया हा रेणू साचू लागतो. या रेणूचा मेंदूतील केंद्रावर परिणाम होतो व उचकी लागू लागते. अतिरेकी मद्यपानामुळे जठराच्या अस्तराचा दाह होतो. काही औषधांचा, विशेषतः भूल देताना वापरण्यात येणाऱ्या औषधांचा हा ज्ञात परिणाम असतो. उचकी लागण्याची अनेक कारणे ज्ञात असली तरी अनेकदा विशिष्ट व्यक्तीमध्ये उचकी लागण्याचे कारण अनेकदा सापडत नाही. मेंदूतील विषाणुजन्य विकारामुळे आठ ते दहा दिवस सतत उचकी लागून मग आपोआप थांबतेदेखील. बहुतेक वेळा उचकी लागते, ती आपोआपच थांबते. त्या वेळेस आपण जे काही करतो त्यामुळेच ती थांबली (कावळा बसावयाला आणि फांदी मोडायला एकच वेळ यावी... काक-तालीय न्यायाने) असा ग्रह होतो. परिणामी, उचकी थांबण्याचे विविध "घरगुती‘ उपाय सांगितले जातात. श्‍वास रोखून धरणे, जीभ जोरात पुढे ओढणे, कोरडी भाकरी चावणे व



गिळणे, लिंबाची साल कडू कार्ल्याच्या रसात बुडवून चोखणे, आल्याचा रस पाण्यात मिसळून घेणे, साखरेचे दाणे तोंडात टाकून आपल्या जिभेच्या मागच्या बाजूने पडजिभेवर दाबून ठेवणे, तोंड व नाक बंद करून श्वास बाहेर टाकण्याचा प्रयत्न करणे), खोकला काढणे, भराभर जोरात श्वास घेणे इत्यादी "उपचार' सांगितले जातात / करवून घेतले जातात. एक उपाय फलदायी ठरला नाही तर दुसरा केला जातो. जेव्हा काही केले तरी उचकी थांबत नाही तेव्हा खरोखरीच्या वैद्यकीय उपचारांकडे माणसे वळतात.

डॉ. सारिका महेश जायखेडकर

# छायाचित्रण - एक कला - कॅमेराची काळजी भाग २

या भागात आपण बाहेर फ़िरायला जाताना किंवा गेल्यावर कॅमेराची कशी काळजी घ्यावी याबद्दल बोलु. आपल्या कॅमेराचा वापर हा घरातील फोटो काढ्ण्यासाठी होत असतो तसाच पिकनिक किंवा घराबाहेर फोटो काढण्यासाठी होत असतो. किंबहुना बाहेरच जास्त होत असतो.. जेव्हा बाहेर कॅमेरा नेतो तेव्हा काही वेळा थोडी काळजी घेतली तर कॅमेऱ्याचे आयुष्य बऱ्यापैकी वाढते.

ही विशिष्ट काळजी घ्यायची ठिकाणं म्हणजे समुद्रकिनारे, धबधबे, नदीकिनारे, वाळवंट / वाळू असलेले भाग,अतिशय थंड किवा अतिशय गरम ठिकाणे. म्हणजेच जवळपास बऱ्याच पिकनिकच्या जागा.

तुम्ही नक्की म्हणत असाल की मग काय कॅमेरा बाहेर न्यायलाच नको की काय? पण जरा काही महत्वाच्या गोष्टी लक्षात ठेवल्या तरी पुरेत आपल्या कॅमेऱ्याची काळजी घ्यायला.

**समुद्रकिनारे, नदीकिनारे, वाळवंट / वाळू असलेले भाग:**

अशा ठिकाणी कॅमेऱ्याला खारट हवा, खारट पाणी आणि वाळू या तिन्ही गोष्टींचा सामना करायला लागतो. या तिन्ही गोष्टीं कॅमेऱ्यासाठी वाईटच.

वाळूमुळे कॅमेऱ्याच्या लेन्सला, सेन्सरला चरे पडू शकतात. बारीक वाळू अडकून कॅमेऱ्याच्या मेकॅनिझम मध्ये बिघाड होऊ शकतो. म्हणजे शटर अडकणे वैगरे होऊ शकते.

म्हणून कुठलाही कॅमेरा सरळ वाळूत खाली न ठेवणे ही अगदी महत्वाची गोष्ट. एस एल आर कॅमेरा असेल तर लेन्स बदलताना अगदी उघड्यावर आणी वाऱ्याच्या दिशेला उभे राहून न करता आडोसा बघुन वारा येणार नाही अशा ठिकाणी बदलावी. म्हणजे वाळूचे कण आत जाणार नाहीत. इथे लेन्स वर यूव्ही (UV) फिल्टर लावला तर चांगलं म्हणजे लेन्सच्या पुढच्या भागावर चरे पडणार नाहीत. समुद्रकिनाऱ्यावरच्या फोटोग्राफी साठी आणखीही उपयोगी फिल्टर आहेत.

शक्यतो कुठल्याही कॅमेऱ्यावर समुद्राचे पाणी उडू देऊ नये. पण समजा उडलेच तर लगेच पुसून शक्यतो प्यायचं पाणी मऊ कापडावर टाकून त्याने कॅमेरा हलकेच पुसून घ्यावा, मग क्लिनिंग लिक्विडने पुसावा. समुद्राचे पाणी खारट असल्याने ते सुकले कि क्षार (salts) जमा होतात. हे कॅमेऱ्यासाठी किवा इतर कुठल्याही इलेक्ट्रोनिक वस्तूंसाठी अतिशय वाईट असते. पण समजा तुमचा कॅमेरा समुद्राच्या पाण्यात अगदी पडलाच आणि अगदी पूर्ण बुडालाच तर काय कराल? सगळ्यात आधी उचलून घाईने जमेल तितक्या लवकर त्याची बॅटरी काढून टाका. मग त्याला तसाच नेऊन अजिबात न सुकवता साध्या पाण्यात बुडवा नाहीतर नळाखाली धरा (पाण्याची धार हळू ठेवा). साध्या पाण्याने सगळे क्षार निघून जातील. नंतर तो कॅमेरा स्वच्छ मऊ कापडाने पुसून कोरडा करा. लेन्स काढून आत पाणी गेलय का ते पण बघा. आत असलेलं पाणीसुद्धा पुसा पण सेन्सर किंवा शटरला हात किंवा कापड लावू नका. कापडाचे सूक्ष्म धागे सेन्सरला चिकटतात आणि शटर मध्ये अडकू शकता. मग कॅमेरा कॅप लावून कोरडा करायला ठेवा. चालू करून बघायची अजिबात घाई करू नका निदान चार पाच दिवस तरी. एवढे झाले की, लवकरात लवकर (अगदी त्याच दिवशी वैगेरे गेलं नाहीत तरी चालेल, ट्रीपवरून घरी गेलात कि मग गेलात तरी चालेल) सर्विस सेंटर मध्ये घेऊन जा. कॅमेरा चालू झाला असला तरी एकदा चेक करून घ्या.

**धबधबे, बोटिंग करताना:**

धबधब्याजवळ जाताना, किंवा बोटिंग करताना पाण्याचे तुषार कॅमेरा किंवा लेन्सवर उडतातच. अशा वेळी एक साधा उपाय करायचा. काही छायाचित्रांच्या आधार स्पष्ट करण्याचा प्रयत्न केला आहे.

एकदोन साध्या प्लॅस्टिकच्या पिशव्या नक्की जवळ बाळगा.




पिशवीला खालच्या बंद टोकाला एक मोठ भोक पाडा / कापा.



आत्ता पिशवी दोन्ही बाजुंनी मोकळी असेल.. मग कॅमेरा पिशवीत घालून दुसऱ्या बाजुने लेन्सचा काही भाग बाहेर काढा.






आता पिशवीच्या एका बाजुच्या मोकळ्या भागातून तुम्हाला व्ह्यू फाईंडर दिसेल व दुसऱ्या मोकळ्या भागातुन लेन्स बाहेर येईल, पण कॅमेऱ्यावर पटकन पाणी पडणार नाही.




प्लॅस्टीकची पिशवी सरकू नये म्हणुन त्याला रबर लावा.
अशाच प्रकारे अगदी हलक्या पावसात किंवा डोंगरांवर ढगांतून चालतानापण अशी पिशवी वापरता येते.
इथेही कॅमेरा ओल्याजागी वैगरे ठेवू नका.

**अतिशय थंड ठिकाणे:**

म्हणजे अगदी बर्फ असणारी ठिकाणे. या ठिकाणी सहसा बॅटरी लवकर संपते म्हणून उपलब्ध असल्यास जास्तीची बॅटरी किंवा चार्जर घेऊन जायला हवाच.
पुन्हा अशा ठिकाणी जी हॉटेल्स वैगेरे असतात तिथे हिटर लावून वातावरण अगदी उबदार केलं असतं. तुम्ही बाहेर फोटो काढलेत आणि तसाच हातात कॅमेरा धरून आत गेलात कि कॅमेऱ्यावर बाष्प (Condensation) जमतं. आणि काच धुसर दिसायला लागते. हे बाष्प कॅमेऱ्याच्या आतल्या बाजूलापण जमू शकत. त्यामुळे कॅमेरा खराब होऊ शकतो किंवा तात्पुरता बंद पडू शकतो. लेन्स वरचं बाष्प पुसलं तरी थोडावेळ थांबल्यावरच कमी होतं.
हे होऊ नये म्हणूनपण एक दोन साध्या प्लॅस्टिकच्या पिशव्या ठेवाव्या. तुम्ही आत जायच्या आधीच कॅमेरा या पिशवीत ठेवून पिशवी बंद करून मग आत जावे. यामुळे कॅमेऱ्यावर बाष्प जमत नाही.

**अतिशय गरम ठिकाणे:**

या अशा ठिकाणीही बॅटरी लवकर संपते म्हणून जास्तीची बॅटरी किंवा चार्जर घेऊन जायला हवाच.
तुम्ही सगळ्यांनीच लहानपणी भिंगाने कापूस जाळायचा प्रयोग केला असाल. कॅमेऱ्याच्या लेन्स मध्ये अशी अनेक भिंगे एकत्र ठेवलेली असतात. त्यामुळे बाहेर उन्हात तसाच ठेवणार असलात तर लेन्स काढून / कॅप लावून ठेवा. नाहीतर आत ऊन जाऊन शटर / सेन्सर अति उष्णतेने जळू किंवा खराब होऊ शकतो. कॅमेरा टॉवेलने वैगेरे झाकलात तरी बरं होईल.
फोटो काढत नसाल तेव्हा कॅमेरा बॅगेत ठेवा.
फोटो काढताना स्वत: शक्यतो एखादी कॅप घाला. यामुळे तुम्ही कॅमेऱ्यातून बघताना व्ह्यू फाईंडरवर किंवा डिजीटल कॅमेऱ्याच्या स्क्रीनवर सावली पडेल आणि दृश्य नीट दिसेल.

**आता कॅमेरा प्रवासातून नेण्याबद्दल एक दोन गोष्टी:**

शक्यतो कॅमेऱ्यासाठी असलेली बॅगच वापरा. याला नीट कुशनिंग असते.
खूप लांबचा किंवा खराब रस्त्यांवरचा प्रवास असेल तर एसएलआर कॅमेऱ्याची लेन्स काढून, लेन्स आणि कॅमेऱ्याला कॅप लावून वेगळी ठेवा. खूप हलल्यामुळे किंवा धक्के बसल्याने कॅमेरा ते लेन्सची जोडणी (camera mount) खराब होऊ शकते. किंवा बॅग खूप आपटली तर कॅमेऱ्याला लावलेली लेन्स तुटू सुद्धा शकते.
विमानप्रवास करत असाल तर चेक इन बॅगेत कॅमेरा टाकू नका. डीजीकॅम वैगेरे छोटे कॅमेरे चालतील पण एसएलआर नाही.
क्लिनिंग किट, ब्लोअर नेहेमी जवळ ठेवा.

जाता जाता......




अजय पडवळ

ajay.padwal@gmail.com

क्रमशः

# ताज्या घडामोडी

## एएलएस आईस बकेट चॅलेंज

मंडळी, सध्या फेसबुक, ट्विटर, युकाही लोक डोक्यावर बर्फाच्या पाण्यानी भरलेली टूब कुठेही लॉग इन केलं की तुम्हाला-बादली ओतून घेतानाचा व्हिडिओ पाहायला मिळतोयामध्ये ख्यातनाम आणि इतर लोकप्रिय व्यक्तिमत्वांचा व्हिडिओंचा . समावेश असल्याने साहजिकच एक उत्सुकता लागून राहते, कि काय आहे हा प्रकार? या ठिकाणी आपण याबद्दल अधिक माहिती गोळा करायचा प्रयत्न केला आहे .

**काय आहे आईस बकेट चॅलेंज?**

जगभरातील अनेक देशांत लोकप्रिय झाल्यानंतर 'आईस बकेट चॅलेंज'चा फिव्हर भारतातही दाखल झालायआत्तापर्यंत . .हे चॅलेंज आहे बर्फाच्या पाण्यानं भरलेला टब आपल्या डोक्यावर उलटा करण्याचं .अनेक सेलिब्रिटीजनं हे चॅलेंज कबूल केलंय त्यानंतर, ज्या व्यक्तीनं हे चॅलेंज स्वीकारलंय तो इतर तीन जणांना हेच कृत्य करण्याचं चॅलेंज करणारहे चॅलेंज पूर्ण . हे चॅलेंज पूर्ण करण्यात ते अयशस्वी झाले तर त्यांना .तासांचा वेळ आहे 24 करण्यासाठी या व्यक्तींना'न्यूरोडीजेनेरेटिव्ह डिसऑर्डर'शी झुंजणाऱ्या लोकांच्या मदतीसाठी चॅरेटी संस्थांना कमीत कमी (हजार रुपये 6 जवळपास) अमेरिकी डॉलर 100 दान द्यावे, अशी अट आहे मेंदूशी निगडीत .'एमियोट्रोफिक लेटरल स्क्लेरोसिस'च्या जागरुकतेसाठी हा एक (एएलएस) .प्रयत्न आहे

**काय आहे एएलएस?**

'एमियोट्रोफिक लेटरल स्क्लेरोसिस' (ALS) हा एक मेंदूच्या पेशींवर, चेतापेशींवर, मज्जारज्जूवर आघात करणारा रोग आहे . आतापर्यंत .जणांना या रोगाची लागण झाली असण्याची शक्यता वर्तवण्यात येत आहे २जगातील प्रत्येक लाख व्यक्तींमागे %२०व्यक्तींपैकी केवळ उपलब्ध असलेल्या माहितीच्या अनुसार एएलएस ची लागण झालेल्याव्यक्ती ५ वर्षे किंवा अधिक जगू शकल्या आहेत .

**कशी झाली आईस बकेट चॅलेंजची सुरुवात?**

एक अमेरिकन बेसबॉल खेळाडू आणि ALS रुग्ण पीट फ्रेट्स याच्या डोक्यात ही कल्पना आली, आणि त्यानी असा एक व्हिडिओ बनवून सोशल मिडिया वर अपलोड केला की ज्यामध्ये त्याच्या काही मित्रांना हेच कृत्य करण्याचं आव्हान दिलं . डॉलर ची देणगी १००जर ते या चॅलेंज मध्ये खरा उतरले नाही तर त्यांनी 'न्यूरोडीजेनेरेटिव्ह डिसऑर्डर'शी झुंजणाऱ्या लोकांच्या मदतीसाठी द्यावी लागेल अशी अट पीटने ठेवली होती आणि तिथूनच या पर्वाला सुरुवात झाली .

**राईस बकेट चॅलेंज**

या 'आइस बकेट' ला आता हैद्राबादमधील एका महिलेने 'राइस बकेट' ने प्रतिउत्तर दिले आहे. मंजुलता कलानिधी असे या महिलेचे नाव आहे. विशेष म्हणजे कलानिधी यांनी सुरु केलेल्या या उपक्रमाला अल्पावधितच सोशल मीडियावर भरपूर प्रतिसाद मिळताना दिसत आहे.

कलानिधी यांच्या मते, समाजतील अनेक माणसांना दोन वेळेस जेवण मिळणे कठीण आहे अशा व्यक्तीना राइस बकेटमुळे फायदा होईल. त्या म्हणाल्या की, बादली भरुनच तांदूळ दिले पाहिजे हे गरजेचे नाही परंतु थोड्या तांदळाचे दान केल्याने भुकेल्या व्यक्तीचे पोट भरु शकते.

**हेतू काय ?**

आपल्या संकृतीमध्ये दान करण्याला खुप महत्व आहे त्यामुळे 'आइस बकेट' ऐवजी 'राइस बकेट' ची संकल्पना सुचल्याचे त्यांनी सांगितले. मंजुलता यांनी वैयक्तिक स्तरावर सुरू केलेल्या या उपक्रमाबद्दल त्यांचे सर्वत्र कौतुक होत आहे.

## How to participate? #**RiceBucket**Challenge

1. Pickup a bowl of rice from your kitchen
2. Go to the nearest needy person and give it to them
3. Click a picture and post it on facebook with hash tag #**RiceBucket**Challenge
4. Tag all your friends and ask them to take up the challenge

*It is important to post back on facebook as it will inspire all you friends to come forward.*
*small drops make an ocean!*

# पहिला स्मार्टफोन विशीत!!

स्मार्टफोनचा शोध लागून ५-१० वर्षे झाली असतील, असा अंदाज कुणीही व्यक्त करेल. मात्र प्रत्यक्षात पहिल्या स्मार्टफोनच्या विक्रीला १६ ऑगस्टला वीस वर्षे पूर्ण झाली आहेत. अर्थात त्यावेळी भारतात मोबाइलचाही प्रवेश झालेला नव्हता.

१६ ऑगस्ट १९९४ रोजी आयबीएस सिमॉन या फोनची विक्री सुरू झाली. मोबाइल आणि कम्प्युटरचे अनेक फीचर्स त्यामध्ये होते. आजच्या इतका दिसायला स्मार्ट नसला, तरी काळ्या खोक्याच्या आकाराच्या या फोनच्या तब्बल ५० हजार मॉडेलची विक्री तेव्हा झाली होती. अर्थात, त्याकाळी त्याला 'स्मार्टफोन' म्हटले जात नव्हते. पण आजच्या काळातील स्मार्टफोनमध्ये असणारे अनेक फीचर्स त्यामध्ये होते. यामध्ये कॅलेंडर होते, ईमेल पाठवता येत होता, त्यात नोट्स साठवता येत होत्या, अॅड्रेस बुक, कॅल्क्युलेटर, वर्क टाइम क्लॉक, हाताने लिहिलेल्या नोट्स साठविण्याची सोय वगैरे गोष्टी होत्या, असे लंडन सायन्स म्युझियमच्या क्युरेटर चार्लोट कोनेली सांगतात.

या फोनच्या २० व्या वर्धापनदिनानिमित्त तो लंडन सायन्स म्युझियमच्या इन्फॉर्मेशन एज गॅलरीमध्ये ठेवला जाणार आहे. अर्धा किलो वजनाचा हा खिशात ठेवण्यास मात्र कठीण होता. त्यात आयफोन ४च्या आकाराची एलसीडी स्क्रीन होती, त्यावर लिहिण्यासाठीचा पेन अर्थात स्टायलस आणि टाइप करताना शब्द सुचविणारा की-बोर्ड होता.

अमेरिकन दूरसंचार कंपनी बेलसेल्फच्या सहाय्याने आयबीएमने तयार केलेला हा फोन सॉफ्टवेअर अॅप असणारा आणि फॅक्स मशीनला जोडता येणारा जगातील पहिलाच मोबाइल होता. फोनच्या खालच्या बाजूला असलेल्या स्लॉटमधून एक्सेल शीट तसेच गेम खेळण्यासाठीचे अॅप असणारे उपकरण जोडता येत होते. मात्र केवळ अमेरिकेतच आणि त्यातही त्या देशातील केवळ १५ राज्यातील नेटवर्कवरच तो वापरता येण्याजोगा होता. मिनी कम्प्युटरसारखाच त्याचा वापर असल्याने प्रामुख्याने व्यावसायिकच त्याचा वापर करत होते. केवळ तासभर चालणारी बॅटरी आणि तब्बल ८९९ डॉलर किंमत, मोबाइल इंटरनेटचा वापर करण्यास असमर्थता या त्या मोबाइलच्या मर्यादा होत्या. त्यामुळे बाजारात आल्यानंतर केवळ २ वर्षे हा मोबाइल बाजारातच राहिला. असे असले तरी, आजच्या फीचर फोनचा विचार करता किंवा स्मार्टफोनशी तुलना करता, त्यातील अनेक गोष्टी २० वर्षांपूर्वीच्या फोनमध्येही उपलब्ध होत्या असे दिसून येते. त्यामुळे गेल्या वीस वर्षांत स्मार्टफोनमध्ये केलेली प्रगती खरंच समाधानकारक आहे का? असा प्रश्न उपस्थित  झाल्याशिवाय राहत नाही.



**ॲमेझॉनकडून सर्वप्रथम भारतात ड्रोन डिलिव्हरी?**

ई-कॉमर्स क्षेत्रातील आघाडीची अमेरिकन कंपनी ॲमेझॉनकडून सर्वप्रथम भारतात ड्रोनच्या माध्यमातून डिलिव्हरी सेवा सुरू केली जाण्याची शक्यता आहे.

ई-कॉमर्स क्षेत्रातील आघाडीची अमेरिकन कंपनी ॲमेझॉनकडून सर्वप्रथम भारतात ड्रोनच्या माध्यमातून डिलिव्हरी सेवा सुरू केली जाण्याची शक्यता आहे. गोडाऊन असलेल्या मुंबई आणि बंगलोर या महानगरांमध्ये या सेवेची चाचणी करत खरेदीचा जोर असलेल्या दिवाळीपर्यंत ॲमेझॉन ड्रोन डिलिव्हरीमध्ये पाऊल ठेवेल, अशी शक्यता या घडामोडीच्या प्रत्यक्षदर्शी सूत्रांनी वर्तवली आहे. ॲमेझॉननेही भविष्यात काय करणार याबाबत वक्तव्य करणार नसल्याचे सांगत उत्सुकता वाढवली आहे. मात्र ही सेवा सुरू झाल्यास त्याच्या सुरक्षेविषयी प्रश्नचिन्ह कायम आहे.

मागच्या डिसेंबरमध्ये ॲमेझॉनने आपल्या 'प्राइम एअर' या ड्रोनची झलक जगाला दाखवली होती. या कल्पनेच्या वास्तवतेबाबत तेव्हा प्रश्न उपस्थित करण्यात आले होते. मात्र कंपनीने या दिशेने आपले प्रयत्न सुरूच ठेवले. अखेर ॲमेझॉनकडून दिवाळीपूर्वी ड्रोन सेवा दाखल केली जाण्याची शक्यता वर्तवली जात आहे. 'प्राइम एअर' या नावाने असलेला कंपनीचा ड्रोन हा एकप्रकारचा ऑक्टोकॉप्टर आहे. ज्याला आठ रॉटर्स जोडलेले असतील. २.२६ किलोग्रॅमपर्यंत वजन वहनाची या ड्रोनची क्षमता असून यावरून ॲमेझॉनवर विकली जाणारी ८६ टक्के उत्पादने डिलिव्हरी केली जाऊ शकतात.

काही दिवसांपूर्वीच ॲमेझॉनने २५ किलोग्रॅमपेक्षा कमी वजनाचे आणि ८० किलोमीटर प्रति तास वेगाने पळणारे उपकरण विकसित करत असल्याचे म्हटले होते. यामुळे सर्वाधिक विक्री होणाऱ्या मोबाइल आणि पुस्तके यांची संबंधित ग्राहकाला अवघ्या दीड तास ते तीन तासांत डिलिव्हरी करणे शक्य होईल. मानवरहित उपकरणासाठी कोणतीही नियमावली नसल्याने ॲमेझॉनसाठी भारत हा ड्रोन सेवेच्या चाचणीसाठी योग्य पर्याय आहे. दुसरीकडे, अमेरिकेत ॲमेझॉनसारख्या कंपनीला ड्रोन उडवण्याची परवानगी मिळणे अशक्य आहे. दरम्यान, नागरी हवाई महासंचालनालयाने यासाठी आवश्यक परवानगी घेतली गेली नसल्याचे स्पष्ट करण्यात आले आहे.

खरीखुरी सेवा की केवळ स्टंटबाजी!

ऑनलाइन विक्रीतील फ्लिपकार्टचे वर्चस्वाला आव्हान देण्यासाठी ॲमेझॉन जोरदार तयारी करत आहे. बाजारातील उलाढालीसाठी महत्त्वाचा समजला जाणारा दिवाळी सणाचा ड्रोन डिलिव्हरीच्या लाँचिंगसाठी शोधलेला मुहूर्त याचाच भाग आहे. ॲमेझॉनने ड्रोनच्या माध्यमातून एक जरी डिलिव्हरी केली तरी ऐन मागणीच्या वेळी त्याचा मोठा गाजावाजा होईल. ज्यामुळे प्रसिद्धी मिळून ॲमेझॉनला या काळातील वाढत्या विक्रीत फ्लिपकार्टपेक्षा एक पाऊल पुढे राहता येईल, असे जाणकारांचे मत आहे.





नमस्कार मंडळी,

'महाराष्ट्र मंडळ अबुधाबी' चा गणेशोत्सव फारच दिमाखात आणि उत्साहपूर्ण वातावरणात पार पडला, आणि तितकाच उत्साहपूर्ण प्रतिसाद आपल्याला नवीन सभासदांकडून मिळाला.

'महाराष्ट्र मंडळ अबुधाबी' तर्फे गणेशोत्सवादरम्यान आणि त्या आधी नवीन नोंदणी केलेल्या सभासदांचे आपण स्वागत करूया.

| नाव | दूरध्वनी क्र. | कार्यालय | अबुधाबी वास्तव्य | भारत वास्तव्य |
|---|---|---|---|---|
| **श्री. जगदीश शेनोय**<br>**सौ. जाह्नवी शेनोय** | ०५५-१०९९१२१ | NPCC | नाजदा स्ट्रीट | कांदिवली |
| **श्री. अमोल मानकर**<br>**सौ. रेवती मानकर** | ०५६-६८७५४९२<br>०५०-५६८३९७२ | Det Norske Veritas | टुरिस्ट क्लब एरिया | कोल्हापूर |
| **श्री. दर्पण सावंत**<br>**सौ. पद्मिनी सावंत** | ०५५-१०५३७९२<br>०५०-६९२७९०२ | NPCC | नाजदा स्ट्रीट | बोरीवली |
| **श्री. चिनार पाटील** | ०५०-३७६५८४२ | Tyco Fire & Security | अल फलाह स्ट्रीट | ठाणे |
| **श्री. अजित राव**<br>**सौ. दिप्ती राव** | ०५०-१२६१४५९<br>०५६-२७१६८२१ | Rova Industrial Supply & Service LLC | मुसफ्फा | पुणे |
| **श्री. अशित कोरगावकर**<br>**सौ. भारती कोरगावकर** | ०५०-५४२९११९<br>०५०-४१२९१९७ | Abu Dhabi Airports<br>ADCB | हमदान स्ट्रीट | मालाड |
| **श्री. अरुण करंडे**<br>**सौ. अनिता करंडे** | ०५०-२१५४४९१<br>०५०-५६३८८९८ | Takreer<br>L.L.H.Hospital | खलिफा स्ट्रीट | बोरीवली |
| **श्री. सचिन पाटील**<br>**सौ. चेताली पाटील** | ०५२-८७२४५७०<br>०५२-६६२३७८२ | Emirates Steel | मुसफ्फा | रायगड |
| **श्री. अविनाश सोलंकी**<br>**सौ. मोहिनी सोलंकी** | ०५५-३३०५२१७ | ADGAS | लिवा स्ट्रीट | अकोला |
| **श्री. अतुल मानकर**<br>**सौ. वैशाली मानकर** | ०५०-२३५७८८४<br>०५६-३४०६३१९ | NPCC | मुसफ्फा | नागपूर |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| **श्री. हर्षल लोखंडे**<br>**सौ. स्नेहल लोखंडे** | ०५५-२००३७३५<br>०५२-६६७६९३७ | Siemens | इलेक्ट्रा स्ट्रीट | नाशिक |
| **श्री. तुषार व्यास** | ०५५-५१२९८०३ | Tebodin | कॉर्निश | अहमदाबाद |
| **श्री. अमोल झाडे**<br>**सौ. श्रुती झाडे** | ०५५-२००१४७६<br>०५६-६९८८६३७ | Siemens | टुरिस्ट क्लब एरिया | नागपूर |
| **श्री. आशिष राणे** | ०५०-४५९९९७५ | SKF Eurotrade | | पुणे |
| **श्री. उल्हास शेटे** | ०५२-७१४२१४१ | Target Engg. & Construction Co. | हमदान स्ट्रीट | पुणे |
| **श्री. रविकांत जोशी**<br>**सौ. पूर्वा जोशी** | ०५०-४५६४३९८<br>०५०-४७८०५५३ | Emphor Trading LLC<br>Emirates Future School | मुसफ्फा | पनवेल |
| **श्री. अमोघ चित्राव**<br>**सौ. सुचित्रा चित्राव** | ०५५-३४३१४०५<br>०५५-२९७४५०५ | ADCO | खलिफा स्ट्रीट | पुणे |
| **श्री. केतन म्हात्रे**<br>**सौ. मंजिरी म्हात्रे** | ०५०-२३९२४६० | Ahalia Hospital | हमदान स्ट्रीट | ठाणे |

धन्यवाद,

महाराष्ट्र मंडळ अबुधाबी कार्यकारी समिती २०१४-१५

## महाराष्ट्र मंडळ आयोजित गणेशोत्सव सोहळ्याची काही क्षणचित्रे


















